शासकीय तंत्रनिकेतनातील अधिव्याख्याता यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन नियुक्ती पुढे सुरु ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्र. पकास-३४२३/प्र.क्र.४२/२३/तांशि-७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २०२३.

संदर्भ :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९/०२/२०१६.
२) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४अ/आस्था-३/परिविक्षा/२०२३/३४०, दि.१२/०५/२०२३.

शासन आदेश:-

शासकीय तंत्रनिकेतनांमधील, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ, या संवर्गातील विविध शासकीय तंत्रनिकेतनातील संबंधित अधिव्याख्याता यांची दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता नियुक्ती करण्यात आली आहे. सदरचा कालावधी पूर्ण झाल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

०२. शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंदर्भातील संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील अटींची पूर्तता संबंधीतांचे प्रकरणी होत असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी खालील तक्त्यात स्तंभ क्र.०६ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून समाप्त करण्यात येत आहे व त्यांची सेवा स्तंभ क्र.७ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून नियमितपणे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नांव, पदनाम व कार्यरत संस्थेचे नांव | नियुक्तीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | कार्यभार धारण केल्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षा कालावधी समाप्तीचा दिनांक | सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्रीमती वाजे सोनाली सदाशिव, अधिव्याख्याता माहिती तंत्रज्ञान, शासकीय तंत्रनिकेतन, ठाणे | शा.नि.क्र. ससेनि-३२१७/ प्र.क्र.६२ /१७/ तांशि-७, दि.२७/०९/२०१७ व शा.नि.क्र. ससेनि-३२१८/प्र.क्र.११ /१८/तांशि-७, दि.०३/०७/२०१८ | ०१/०८/२०१८ (म.पू.) | निरंक | ३१/०७/२०२० (म.नं.) | ०१/०८/२०२० (म.पू.) |
| २ | श्रीमती ज्योती वसंत देवकर, अधिव्याख्याता भौतिकशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, पेण | शा.नि.क्र. ससेनि-३२१८/ प्र.क्र.६८/ १८/ तांशि-७, दि.२६/११/२०१८ | ०३/१२/२०१८ (म.पू.) | एकूण ०६ दिवस | ०८/१२/२०२० (म.नं.) | ०९/१२/२०२० (म.पू.) |

०३. संबंधित संस्था प्रमुखांनी उक्त अधिव्याख्यातांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही तातडीने करावी.

०४. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदीन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि/२७१५/ प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांस प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१६१६२५१९४२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.06.16 16:26:38 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-** संबंधित अधिव्याख्याते (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई,
३. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, ठाणे/पेण,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/ठाणे,
६. निवडनस्ती/तांशि-७.